चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करण्यासाठी निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

महाराष्ट्र शासन,
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,
शासन निर्णय क्र. चंसैशा २०१८/ प्र.क्र. ११४/ एसएम-६
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१.०१.२०१९

वाचा :

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. इसैशा-२०१६/ प्र.क्र.९६/ एसएम-६ दिनांक १३.०४.२०१७
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा-२०१७/ प्र.क्र.५५/ एसएम-६ दिनांक २२.०८.२०१७
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा २०१८/ प्र.क्र. ३३/ एसएम-६ दिनांक १२.०९.२०१८
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. इसैशा २०१८/ प्र.क्र. ११४/ एसएम-६ दिनांक ०६.१०.२०१८
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दिनांक ५.१२.२०१८
६) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,चंद्रपूर यांचे पत्र क्र. १०५११/का-२(५)/तां/२०१८, दिनांक १०.१२.२०१८

प्रस्तावना :

भिवकुंड, जि. चंद्रपूर येथील सैनिकी शाळेच्या प्रवेशद्वारासह संरक्षण भिंत, सिमेंट काँक्रीट नालीसह पोचमार्गाचे बांधकाम करण्याबाबतच्या रु. १२३६.७७ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच वित्त विभाग व सचिव समितीच्या मान्यतेने संदर्भाधीन क्र. (१) येथील दिनांक १३.४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच चंद्रपूर सैनिकी शाळेच्या इमारती व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी रु. २९६.८५ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (२) येथील दिनांक २२.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. चंद्रपूर सैनिकी शाळेच्या अतिरिक्त (भाग-२) बांधकामासाठी रु.१९२.०० कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (३) येथील दिनांक १२.९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर बांधकामासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु. ४०.०० कोटी व सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात रु. ७०.०० कोटी असा एकूण रु. ११०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर बांधकाम विहित मुदतीत पूर्ण करण्यासाठी उर्वरित रु.३४८.०० कोटी आवश्यक आहेत.

२. भिवकुंड, जिल्हा चंद्रपूर येथील नवीन सैनिकी शाळेच्या इमारतीचे व पायाभूत सुविधांचे बांधकाम विहित कालावधीत पूर्ण करण्यासाठी अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांनी रु. १८५.०० कोटी वितरीत करण्याची मागणी संदर्भाधीन क्र. (६) अन्वये केली आहे. यामध्ये रु. १००.०० कोटीच्या पुरवणी मागणी पैकी अवितरीत रु. ३०.०० कोटी, सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पिय तरतूद रु. ५.०० कोटी व नोव्हेंबर,२०१८ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसकल्पित केलेले रु. १५०.०० कोटी यांचा समावेश आहे. नोव्हेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशात

रु. १५०.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारा अर्थसंकल्पित असून नियोजन व वित्त विभागाने ७० टक्केच्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे. चंद्रपूर सैनिकी शाळेच्या इमारती व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

चंद्रपूर सैनिकी शाळेची इमारत व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी रु. १९२.०० कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकापैकी वित्त विभागाच्या आदेशानुसार, रु. १५०.०० कोटी (रुपये दीडशे कोटी फक्त) इतक्या निधीपैकी ७० टक्के म्हणजेच रु. १०५.०० कोटी (रुपये एकशे पाच कोटी फक्त) व सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात सदर बांधकामासाठी अर्थसंकल्पिय तरतूद रु. ५.०० कोटी (रुपये पाच कोटी फक्त) इतक्या निधीपैकी ७० टक्के म्हणजेच रु. ३.५० कोटी (रुपये तीन कोटी पन्नास लाख फक्त) असा एकूण रु. १०८.५० कोटी (रुपये एकशे आठ कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी सदर बांधकामासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला,व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (०१)- सैनिकी शाळेचे बांधकाम, (००) (०५) चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करणे (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात येईल. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल सादर करावा.

३. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२.०४.२०१८ व क्रमांक अर्थसं-२०१७/ प्र.क्र.९४/ अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

४. सदर आदेश नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २६५/१४७१, दिनांक १९.१२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०२७/ व्यय-५, दिनांक २६.१२.२०१८अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०११३१७४१६०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2019.01.01 13:24:39 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्यमंत्री सचिवालय यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ३२

२. सर्व विधान सभा /विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. मुख्य सचिव यांचे उप सचिव
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
१०.शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११.शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.विभागीय शिक्षण उप संचालक,नागपूर विभाग, नागपूर
१३.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर
१४.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, चंद्रपूर,
१५.शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१६.शिक्षणाधिकारी ( प्राथमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१७.कक्ष अधिकारी , (व्यय ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कक्ष अधिकारी ( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.निवडनस्ती.

प्रत माहितीसाठी-

१. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई ३२
३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२